**वसंतराव नाईक विमुक्त जाती व भटक्या जमाती विकास महामंडळांतर्गत विणकर समाज आर्थिक विकास महामंडळ या उपकंपनीची (Subsidiary) स्थापना करण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**इतर मागास बहुजन कल्याण विभाग,**
**शासन निर्णय क्रमांक : महामं-२०२४/प्र.क्र.२४/महामंडळे**
मोतीमहल इमारत, चर्चगेट, मुंबई ४०० ०२०.
दिनांक : ०४ मार्च, २०२५

**संदर्भ :** इतर मागास बहुजन कल्याण विभाग, शासन निर्णय समक्रमांक, दिनांक १६.०३.२०२४

**प्रस्तावना :-**

विणकर समाजाच्या सामाजिक व आर्थिक विकासासाठी स्वतंत्र महामंडळ स्थापन करण्याची मागणी गेली अनेक वर्षांपासून लोकप्रतिनिधी, विविध संघटना यांचेकडून केली जात आहे. राज्यातील इतर मागासवर्ग तसेच विशेष मागास प्रवर्गांमध्ये समावेश असलेला विणकर समाज व त्यांच्या विविध पोटजाती ह्या प्रामुख्याने आर्थिक व सामाजिकदृष्ट्या मागासलेल्या आहेत. राज्यातील सर्व जिल्ह्यांमध्ये वास्तव्यास असलेल्या विणकर समाजातील युवकांना वसंतराव नाईक विमुक्त जाती व भटक्या जमाती विकास महामंडळ व महाराष्ट्र राज्य इतर मागासवर्गीय वित्त आणि विकास महामंडळाच्या धर्तीवर विविध योजनांचा लाभ मिळून विणकर समाजाच्या सर्वांगिण विकासासाठी व आर्थिक उन्नतीसाठी प्रयत्न करण्याकरिता “विणकर समाज आर्थिक विकास महामंडळ” या स्वतंत्र महामंडळाची स्थापना करण्यास संदर्भ क्र.१ येथील दिनांक १६.०३.२०२४ च्या शासन निर्णयान्वये मान्यता देण्यात आली होती.

विणकर समाजाचा इतर मागासवर्ग तसेच विशेष मागास प्रवर्गामध्ये समावेश होतो. यापूर्वी रामोशी/बेडर, वडार, लोहार व गवळी या समाज घटकांकरिता अनुक्रमे राजे उमाजी नाईक आर्थिक विकास महामंडळ, पैलवान कै.मारूती चव्हाण- वडार आर्थिक विकास महामंडळ, ब्रम्हलिन आचार्य दिव्यानंद पुरीजी महाराज आर्थिक विकास महामंडळ व श्रीकृष्ण आर्थिक विकास महामंडळ या उपकंपन्यांची वसंतराव नाईक विमुक्त जाती व भटक्या जमाती विकास महामंडळांतर्गत स्थापना करण्यात आली आहे. त्याच धर्तीवर विणकर समाज आर्थिक विकास महामंडळाची वसंतराव नाईक विमुक्त जाती व भटक्या जमाती विकास महामंडळांतर्गत उपकंपनी म्हणून स्थापना करणे सुलभ होईल. त्यानुषंगाने, वसंतराव नाईक विमुक्त जाती व भटक्या जमाती विकास महामंडळांतर्गत “विणकर समाज आर्थिक विकास महामंडळ” या उपकंपनीची स्थापना करण्याची बाब विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

**अ)** संदर्भाधिन दिनांक १६.०३.२०२४ रोजीचा शासन निर्णय या शासन निर्णयान्वये अधिक्रमित करण्यात येत आहे.

**ब)** राज्यातील राज्यातील विमुक्त जाती व भटक्या जमाती प्रवर्गांची सामाजिक व आर्थिक उन्नती व्हावी यासाठी सध्या कार्यरत असलेल्या वसंतराव नाईक विमुक्त जाती व भटक्या जमाती विकास महामंडळांतर्गत विणकर समाजाच्या सामाजिक व आर्थिक विकासासाठी आर्थिक विकास महामंडळ स्थापन करण्यास शासन मान्यता देत आहे. सदरचे महामंडळ "विणकर समाज आर्थिक विकास महामंडळ (वसंतराव नाईक विमुक्त जाती व भटक्या जमाती विकास महामंडळाची उपकंपनी)" या नावाने संबोधले जाईल. वसंतराव नाईक विमुक्त जाती व भटक्या जमाती विकास महामंडळाच्या नियंत्रणाखाली सदर उपकंपनीचे कामकाज चालविण्यात येईल.

**क)** विणकर समाज आर्थिक विकास महामंडळाची रचना, कार्य, राबविण्यात येणाऱ्या योजना याबाबतचा तपशील खालीलप्रमाणे :-

**१. <u>महामंडळाची रचना (राज्यस्तर / जिल्हास्तर)</u>**

उपकंपनीचे मुख्यालय मुंबई येथे वसंतराव नाईक विमुक्त जाती व भटक्या जमाती विकास महामंडळाचे मुख्यालयाच्या ठिकाणी राहील. राज्यातील सर्व जिल्ह्यांमध्ये जिल्हा कार्यालये कार्यरत राहतील.

महामंडळाच्या संचालक मंडळावर खालीलप्रमाणे अध्यक्ष, उपाध्यक्षांसह तीन अशासकीय सदस्य व चार शासकीय सदस्य राहतील :-

| | | |
|---|---|---|
| १. | मा. मंत्री (इतर मागास बहुजन कल्याण) | पदसिध्द अध्यक्ष |
| २. | **शासन नियुक्त पदाधिकारी**<br>वसंतराव नाईक विमुक्त जाती व भटक्या जमाती विकास महामंडळ मर्या., मुंबई यांचे उपाध्यक्ष | उपाध्यक्ष |
| ३. | **अपर मुख्य सचिव / प्रधान सचिव / सचिव**<br>इतर मागास बहुजन कल्याण विभाग, मंत्रालय, मुंबई | संचालक |
| ४. | **सह सचिव / उप सचिव**<br>इतर मागास बहुजन कल्याण विभाग, मंत्रालय, मुंबई | संचालक |
| ५. | **संचालक,**<br>इतर मागास बहुजन कल्याण संचालनालय, महाराष्ट्र राज्य, पुणे | संचालक |
| ६. | **व्यवस्थापकीय संचालक,**<br>वसंतराव नाईक विमुक्त जाती व भटक्या जमाती विकास महामंडळ मर्या., मुंबई | संचालक तथा व्यवस्थापकीय संचालक |
| ७. | **अशासकीय सदस्य - ३** | संचालक |

**२. <u>विणकर समाज आर्थिक विकास महामंडळाची कार्ये :-</u>**

१. राज्यातील विणकर समाजाच्या कल्याण व विकासासाठी काम करणे.
२. विणकर समाजाच्या व्यक्तींना अल्प व्याज दराने स्वयंरोजगाराकरिता कर्ज उपलब्ध करुन देणे व त्याची वसूली करणे.
३. विणकर समाजाची आर्थिक स्थिती सुधारण्यासाठी पतसाधने, साधनसामुग्री आणि तांत्रिक व व्यवस्थापकीय साधने पुरविणे.

४. विणकर समाजासाठी कृषी उत्पादने, वस्तू, साहित्य आणि सामुग्री यांची निर्मिती, जुळवणी व पुरवठा यासाठी आवश्यक वाटतील अशा सेवा देणे.
५. राज्यातील विणकर समाजाच्या कल्याणासाठी योजना सुरु करणे आणि त्यांना चालना देणे व योजनासाठी अहवाल तयार करणे.
६. वसंतराव नाईक विमुक्त जाती व भटक्या जमाती विकास महामंडळाच्या धर्तीवर शासनाने मंजूरी दिलेल्या योजना राबविणे.

**३. विणकर समाज आर्थिक विकास महामंडळाच्या योजना :-**

**अ) २५% बीज भांडवल योजना :-**

१. राष्ट्रीयकृत बँका, जिल्हा अग्रणी बँका व जिल्हा मध्यवर्ती बँकांच्या माध्यमातून राबविली जाईल.
२. महामंडळाचा सहभाग २५% राहील.
३. बँकांचा सहभाग ७५% असेल.
४. या योजनेमध्ये महत्तम प्रकल्प मर्यादा रु.५.०० लक्ष असेल.
५. व्याजाचा दर ४% असून परतफेडीचा कालावधी ५ वर्षे असेल.

**ब) रु.१.०० लक्षपर्यंतची थेट कर्ज योजना :-**

१. शासनाकडून प्राप्त भाग भांडवलातून महामंडळ ही योजना राबविते.
२. रु.१.०० लक्ष पर्यंत थेट कर्ज उपलब्ध.
३. लाभार्थीचा सहभाग निरंक.
४. ४८ समान मासिक हप्त्यांमध्ये मुद्दल रु.२,०८५/- नियमित परतफेड करणाऱ्या लाभार्थीना व्याज आकारण्यात येणार नाही. नियमित कर्जाची परतफेड न करणाऱ्या लाभार्थीना जेवढे कर्जाचे हप्ते थकित होतील त्या रक्कमेवर द.सा.द.से. ४% व्याज आकारण्यात येईल.

वसंतराव नाईक विमुक्त जाती व भटक्या जमाती विकास महामंडळाकडून शासनाने मान्यता दिलेल्या खालीलप्रमाणे राबविल्या जाणाऱ्या कर्ज व्याज परतावा योजना या आर्थिक विकास महामंडळाकरीता देखील राबविल्या जातील.

**क) वैयक्तिक कर्ज व्याज परतावा :-**

१. शासनाकडून प्राप्त सहायक अनुदान रकमेतून महामंडळ ही योजना राबवते.
२. बँकेकडून कर्जमर्यादा रु.१०.०० लक्षपर्यंत.
३. बँकेने रू.१०.०० लाखापर्यंतच्या मर्यादेत कर्ज मंजूर केलेल्या उमेदवाराने वेळेत कर्जाचे हफ्ते भरल्यास, हफ्ता भरल्यावर त्यातील व्याजाची रक्कम (१२ % च्या मर्यादेत) त्यांच्या आधार लिंक, बँक खात्यात दरमहा महामंडळामार्फत जमा करण्यात येईल. सदर योजना संपूर्णपणे संगणकीकृत असून सदर सार्वजनिक वित्तीय व्यवस्थापन प्रणाली (पीएफएमएस) अथवा तत्सम संगणक प्रणालीद्वारे राबविण्यात येईल. व्यवसायाच्या स्वरूपानुसार कर्ज रक्कम मंजूर करण्यात येईल.
४. कुटूंबातील एकाच व्यक्तीला या योजनेचा लाभ घेता येईल.

५. वेबपोर्टल / महामंडळाच्या संगणक प्रणालीवर नाव नोंदणी अनिवार्य.
६. कर्ज परतफेडीचा कालावधी बँक निकषांनुसार.

**ड) गट कर्ज व्याज परतावा योजना रु.१०.०० लक्ष ते रु.५०.०० लक्ष :-**

१. शासनाकडून प्राप्त सहायक अनुदान रकमेतून महामंडळ ही योजना राबविते.
२. बँकेकडून प्रती गटास कमीत कमी रु.१०.०० लक्ष ते जास्तीत जास्त रु.५०.०० लक्षपर्यंतच्या मंजूर उद्योग उभारणीकरीता.
३. पात्र शेतकरी उत्पादक (Farmers Producers Organizations FPO) गटांना रु.१०.०० लक्षपर्यंत बिनव्याजी दराने कर्ज रक्कम उद्योगाकरीता देण्यात येईल.
४. योजना संपूर्णपणे संगणकीकृत असून सदर प्रक्रिया सार्वजनिक वित्तीय व्यवस्थापन प्रणाली (पीएफएमएस) अथवा तत्सम संगणक प्रणालीद्वारे राबविण्यात येईल.
५. मंजूर कर्जावर ५ वर्षापर्यंत अथवा कर्ज कालावधी या पैकी जे कमी असले ते, कर्ज मंजूर केलेल्या गटाने वेळेत कर्जाचे हप्ते भरल्यास, हप्ता भरल्यावर जास्तीत जास्त १२ टक्के व्याज दराच्या आणि रु.१५.०० लक्षच्या मर्यादेत त्यातील व्याजाची रक्कम त्यांच्या आधार लिंक बँक खात्यात दरमहा महामंडळामार्फत जमा करण्यात येईल.
६. महामंडळ केवळ बँकेने वेळेत वसूल केलेली योग्य व्याज रक्कम अदा करेल.
७. गटातील उमेदवारांनी महामंडळाच्या अधिकृत वेबपोर्टलवर अर्ज सादर करणे बंधनकारक असेल. प्रस्ताव सादर केल्यावर दिलेल्या अटी व शर्तीनुसार प्रस्ताव पात्र ठरत असल्यास गटास संगणकीकृत सशर्त हेतू पत्र (Letter of Intent ) दिले जाईल. गटाने या आधारे बँकेकडून प्रकरणावर कर्ज मंजूर करुन घ्यावे लागेल.

**४.** वसंतराव नाईक विमुक्त जाती व भटक्या जमाती विकास महामंडळ या मुख्य कंपनीच्या योजनांमध्ये काही बदल झाल्यास सदर बदल विणकर समाज आर्थिक विकास महामंडळ या उपकंपनीसही लागू राहतील.

**५.** विणकर समाज आर्थिक विकास महामंडळाचे (उपकंपनी) मुख्यालय मुंबई येथे व जिल्हा स्तरावरील कामकाज वसंतराव नाईक विमुक्त जाती व भटक्या जमाती विकास महामंडळाच्या ३६ जिल्ह्यांच्या ठिकाणी कार्यरत असणाऱ्या कार्यालयांमधील अधिकारी / कर्मचाऱ्यांमार्फत पाहण्यात येईल.

**६.** विणकर समाज आर्थिक विकास महामंडळास (उपकंपनी) अधिकृत भागभांडवल रु.५०.०० कोटी (अक्षरी रुपये पन्नास कोटी फक्त) मंजूर करण्यात येत आहे.

**७.** दरवर्षी या महामंडळास विविध योजना राबविण्यासाठी रु.५.०० कोटी (अक्षरी रुपये पाच कोटी फक्त) इतके भागभांडवल मंजूर करण्यात येईल.

**८.** विणकर समाज आर्थिक विकास महामंडळ (उपकंपनी) कामकाजाकरिता मुख्यालयासाठी एकूण १५ पदे मंजूर करण्यात येत आहेत. त्याबाबतचा तपशील खालीलप्रमाणे :-

| अ.क्र. | पदनाम | वेतनश्रेणी | आवश्यक पदे |
|---|---|---|---|
| १ | महाव्यवस्थापक | वेतन श्रेणी रू. १५६०० - ३९१००, ग्रेड वेतन - ६६००/- | १ |
| २ | व्यवस्थापक (प्रशासन व कर्मचारी) | वेतन श्रेणी रू. १५६०० - ३९१००, ग्रेड वेतन - ६६००/- | १ |
| ३ | व्यवस्थापक (वित्त व लेखा) | वेतन श्रेणी रू. १५६०० - ३९१००, ग्रेड वेतन - ६६००/- | १ |
| ४ | सहायक व्यवस्थापक (प्रशासन व कर्मचारी) | वेतन श्रेणी रू .९३०० -३४८००, ग्रेड वेतन - ४४००/- | १ |
| ५ | सहायक व्यवस्थापक (प्रकल्प) | वेतन श्रेणी रू. ९३०० - ३४८००, ग्रेड वेतन - ४४००/- | १ |
| ६ | कार्यालयीन सहायक | वेतन श्रेणी रू. ५२०० - २०२००, ग्रेड वेतन - २८००/- | २ |
| ७ | लेखा सहायक (रोखपाल) | वेतन श्रेणी रू. ५२०० - २०२००, ग्रेड वेतन - २८००/- | १ |
| ८ | लिपिक - टंकलेखक | वेतन श्रेणी रू. ५२०० - २०२००, ग्रेड वेतन - १९००/- | ४ |
| ९ | वाहनचालक | वेतन श्रेणी रू. ५२०० - २०२००, ग्रेड वेतन - १९००/- | १ |
| १० | शिपाई | वेतन श्रेणी रू. ४४४० - ७४४०, ग्रेड वेतन - १३००/- | २ |
| **एकूण** | | | **१५** |

**९.** सन २०२४-२५ या आर्थिक वर्षात विणकर समाज आर्थिक विकास महामंडळ या उपकंपनी करिता वेतन रु.११४.०० लक्ष व वेतनेत्तर खर्चासाठी रु.२०.०० लक्ष, अशी एकूण रु.१३४.०० लक्ष इतकी तरतूद मंजूर करण्यात येत आहे. तसेच, मुख्य कंपनीच्या आस्थापनेवरील पदांचे कार्यभार व निकषांनुसार उपकंपनीतील मंजूर पदांकरिता कार्यभार व निकष लागू राहतील.

**१०.** या उपकंपनीचे मुख्यालय मुंबई येथे वसंतराव नाईक विमुक्त जाती व भटक्या जमाती विकास महामंडळाच्या मुख्यालयांतर्गत राहील.

**११.** जिल्हा स्तरावरील कामकाजासाठी वसंतराव नाईक विमुक्त जाती व भटक्या जमाती विकास महामंडळाच्या जिल्हा कार्यालयांमधील मंजूर अधिकारी / कर्मचाऱ्यांकडूनच उपकंपनीचे कामकाज करण्यात येईल.

**१२.** वसंतराव नाईक विमुक्त जाती व भटक्या जमाती विकास महामंडळाचे व्यवस्थापकीय संचालक हे या उपकंपनीचे व्यवस्थापकीय संचालक म्हणून काम पाहतील.

**१३.** विणकर समाज आर्थिक विकास महामंडळाचे (उपकंपनी) नोंदणीकृत कार्यालय मुंबई येथे राहील.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक सांकेतांक क्रमांक २०२५०३०४१३००४६६०३४ असा आहे. हा शासन निर्णय डिजिटल स्वाक्षरीने साक्षांकित करून काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

Digitally signed by RAVINDRA RAMDAS PETKAR
Date: 2025.03.04 13:02:04 +05'30'

**( र. रा. पेटकर )**

**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. मा. राज्यपाल यांचे सचिव, राजभवन, मलबार हिल, मुंबई.
२. मा. सभापती / उपसभापती, महाराष्ट्र विधानपरिषद यांचे खाजगी सचिव.
३. मा. अध्यक्ष / उपाध्यक्ष, महाराष्ट्र विधानसभा यांचे खाजगी सचिव.
४. मा. मुख्यमंत्री यांचे अपर मुख्य सचिव, मंत्रालय, मुंबई.
५. मा. उपमुख्यमंत्री (नगर विकास) यांचे खाजगी सचिव.
६. मा. उपमुख्यमंत्री (वित्त) यांचे खाजगी सचिव.
७. मा. मंत्री (इतर मागास बहुजन कल्याण) यांच खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
८. सर्व मा. मंत्री यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
९. मा. विरोधी पक्षनेता, विधानपरिषद / विधानसभा , विधानमंडळ, मुंबई / नागपूर.
१०. सर्व सन्माननीय सदस्य, विधानपरिषद / विधानसभा.
११. मा. मुख्य सचिव, महाराष्ट्र राज्य, मंत्रालय, मुंबई.
१२. अतिरिक्त मुख्य सचिव / प्रधान सचिव / सचिव, सर्व प्रशासकीय विभाग, मंत्रालय, मुंबई.
१३. संचालक, समाज कल्याण, महाराष्ट्र राज्य, पुणे.
१४.संचालक, इतर मागास बहुजन कल्याण संचालनालय, महाराष्ट्र राज्य, पुणे.
१५.विभागीय समाज कल्याण अधिकारी, मुंबई विभाग, नवी मुंबई (दोन प्रती).
१६. व्यवस्थापकीय संचालक, वसंतराव नाईक विमुक्त जाती व भटक्या जमाती विकास महामंडळ मर्या., मुंबई.
१७.प्रादेशिक व्यवस्थापक, वसंतराव नाईक विमुक्त जाती व भटक्या जमाती विकास महामंडळ मर्या., मुंबई शहर / ठाणे / छत्रपती संभाजीनगर / नागपूर / पुणे / नाशिक.
१८. महालेखापाल (लेखा अनुज्ञेयता / लेखा व लेखा परीक्षा), महाराष्ट्र १/२ , मुंबई / नागपूर.
१९. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.
२०. जिल्हा कोषागार अधिकारी, मुंबई, ठाणे.
२१. निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई.
२२. अपर कोषागार अधिकारी, कोकण भवन, नवी मुंबई.
२३. वित्त विभाग (कार्यासन व्यय १४ / अर्थोपाय / अर्थसंकल्प-३ / साउ), मंत्रालय, मुंबई.

२४. सहसंचालक, लेखा व कोषागारे, संगणक कक्ष, नवीन प्रशासन भवन, पाचवा मजला, मंत्रालय, मुंबई.

२५. कक्ष अधिकारी (अर्थसंकल्प), इतर मागास बहुजन कल्याण विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.

२६. निवडनस्ती (महामंडळे).